**कोयना प्रकल्प टप्पा १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१८/४००/प्र.क्र.१०६/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २२/११/२०१८

वाचा -

१) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९
४) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: संकिर्ण २०११/प्र.क्र.८० (भाग-२)/र-८, दि. २५/०७/२०१३
५) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
६) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. पुनर्व-२०१८/७१/प्र.क्र.२२/र-८, दि. ०१/०३/२०१८
७) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. पुनर्व/उपले/आर आर/३१५६/२०१८, दि. २५/०९/२०१८

प्रस्तावना -

विभागीय आयुक्त, पुणे यांनी संदर्भाधिन क्र. ७ येथील पत्रान्वये कोयना प्रकल्प टप्पा १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान २४ नागरी सुविधा कामांपैकी २२ नागरी सुविधा कामांच्या सुधारित अंदाजपत्रकीय रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यास्तव प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रकल्पांतर्गत पाटण तालुक्यातील २४ नागरी सुविधा कामांच्या रु. १,२६,९९,८४२/- एवढया अंदाजपत्रकीय रकमेस संदर्भाधिन क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापि, दरम्यानचे कालावधीमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाची नवीन दरसूची लागू झाल्यामुळे, तसेच मुळ अंदाजपत्रकीय रकमेमध्ये जुलै २०१७ पासून लागू वस्तु व सेवा कराचा अंतर्भाव नसल्याने सदर बाबीची पुर्तता करुन, प्रचलित सन २०१७-२०१८ च्या दरसूचीनूसार अद्ययावत व मूळ अंदाजपत्रकीय रकमेपेक्षा वाढ असलेल्या २२ नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकीय किंमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे.

२. याबाबत शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ अन्वये प्रदान अधिकारानुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ६ परिच्छेद क्र.२७ (अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला सुधारित प्रशासकीय मान्यता करण्यासंदर्भात सुधारित अंदाजातील अधिक्य मुळ मंजूर अंदाजित खर्चाच्या १५ % मर्यादेत असल्यास

सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास आहेत. त्यानूसार संदर्भाधिन क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान नागरी सुविधा कामांपैकी सोबतच्या विवरणामध्ये नमूद २२ नागरी सुविधा कामांची मूळ प्रशासकीय मान्यता रद्द करुन, सदर कामांना प्रस्तावित केल्याप्रमाणे सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -**

**त्यानुसार, कोयना प्रकल्प टप्पा १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद २२ नागरी सुविधा कामांची मूळ प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येऊन, सदर कामांच्या एकूण रू. १,३०,३०,३७७/- ( अक्षरी रूपये एक कोटी तीस लक्ष तीस हजार तीनशे सत्याहत्तर फक्त) अंदाजपत्रकीय रकमेस मुळ प्रशासकीय मान्यता आदेशातील अटींच्या अधिन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.**

२ कार्यकारी अभियंता, कण्हेर कालवे विभाग क्र. २, करवडी (कराड) यांनी मुळ प्रशासकीय मान्यतेमध्ये नमूद केल्यानूसार कार्यवाही करुन नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल (Work Progress Report)/खर्चाच्या प्रगतीचा अहवाल ( Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार " मागणी क्रमांक सी-१० ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३) इतर प्रकल्प ४७०१-एच-७२७ (योजनांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२२१२४७५२९०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: CN = Dayanand S Munjale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And Forest Department
Date: 2018.11.22 12:55:28 +05'30'

**(द. शं. मुंजाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) पुणे विभाग, पुणे
२. उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक सातारा
४. अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा
५. कार्यकारी अभियंता, कण्हेर कालवे विभाग क्र. २, करवडी (कराड), जि. सातारा
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)

७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
१०. उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन) सातारा
११. जलसंपदा विभाग /मोप्र-२, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१४. महसूल व वन विभाग, ब-१, पीएसी कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.
१५. निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र: पुनर्व-२०१८/४००/प्र.क्र.१०६/र-८ दि. २२/११/२०१८ सोबतचे विवरणपत्र**

**कोयना प्रकल्प टप्पा १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान एकूण २२ नागरी सुविधा कामांचा तपशील**

| अ क्र | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | सुधारित अंदाजपत्रकीय रक्कम रू. |
|---|---|---|---|
| १ | ढोकावळे रिसवड | पोहोच रस्ता डांबरीकरण कि.मी. ३ व ४, मोरी बांधकाम | ५७,६८,४३७/- |
| २ | किसरुळे-बोपोली (दवंडेवस्ती, लाडवस्ती, भरड वस्ती, माने वस्ती) | पोहोच रस्त्यावर मोरी बांधकाम करणे | ५,६४,७१३/- |
| ३ | बाजे-मारुल | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे कि.मी.क्र.३ | १७,९८,९०५/- |
| ४ | मिरगाव-बोपोली | स्मशानभूमी शेड | २,२३,५४७/- |
| ५ | ढोकावळे-रिसवड | स्मशानभूमी शेड व पोहोच रस्ता करणे | ३,५६,४५३/- |
| ६ | नहींब-मेढेघर | स्मशानभूमी शेड | २,२२,८७३/- |
| ७ | गोजेगाव-वांझोळे | स्मशानभूमी शेड | २,२१,१०४/- |
| ८ | चिरंबे-मणेरी | स्मशानभूमी शेड | २,२२,७४७/- |
| ९ | आंबेघर-रासाटी | स्मशानभूमी शेड | २,२१,५४०/- |
| १० | किसरुळे-मेंढेघर | स्मशानभूमी शेड | २,२३,१५८/- |
| ११ | किसरुळे-ढाणकल | स्मशानभूमी शेड | २,२५,९१८/- |
| १२ | आंबेघर-रासाटी | बस थांबा | २,६६,७६७/- |
| १३ | म्हाळूंगे-शिवंदेश्वर | बस थांबा | २,७३,१९५/- |
| १४ | मिरगाव-चाफेर | बस थांबा | २,६४,६४९/- |
| १५ | नहिंबे-तळीये | बस थांबा | २,६९,०२५/- |
| १६ | नवजा-ढाणकल | बस थांबा | २,७४,६३०/- |
| १७ | किसरुळे-मेंढेघर | बस थांबा | २,७२,०२०/- |

| अ क्र | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | सुधारित अंदाजपत्रकीय रक्कम रू. |
|---|---|---|---|
| १८ | नहिंबे-मेंढेघर | बस थांबा | २,७१,५१६/- |
| १९ | हुंबरळी-देशमुखवाडी | बस थांबा | २,६७,९५३/- |
| २० | झाडोली-नेचल | बस थांबा | २,७३,४५१/- |
| २१ | तळोशी-कोंडावळे | बस थांबा | २,६९,९०३/- |
| २२ | किसरुळे-ढाणकल | बस थांबा | २,७७,८७३/- |
| | | **एकूण** | **१,३०,३०,३७७/-** |

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: CN = Dayanand S Munjale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And Forest Department
Date: 2018.11.22 12:55:49 +05'30'

**(द.शं.मुंजाळे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**